# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१७

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

**नागपूर जिल्हा मध्यवर्ती को-ऑप, बँकेच्या आर्थिक घोटाळयातील रक्कमेच्या वसुली आदेशाविरुध्द आपणाकडे दाखल अपिल निकाली काढण्याबाबत**

**(१) १११८ (२९-०१-२०१५). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत सन २००२ साली झालेल्या आर्थिक भ्रष्टाचाराची चौकशी विशेष अधिक्षक श्री.यशवंत बागडे यांनी केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, श्री.बागडे यांनी केलेल्या चौकशीत १२४.६० कोटी रुपयांचा भ्रष्टाचार झाल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, घोटाळयाची रक्कम १२ टक्के दराने तत्कालीन अध्यक्ष श्री.सुनिल केदार व श्री.अशोक चौधरी यांचेकडून वसूल करावी असे आदेश श्री.बागडे यांनी दिले होते, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या आदेशाविरुध्द तत्कालीन अध्यक्ष श्री.सुनिल केदार यांनी सहकार मंत्र्याकडे अपील दाखल केले, हे ही खरे आहे काय,

(५) असल्या, ह्या अपिलावर अद्याप कोणतीही कार्यवाही न करता प्रलंबित ठेवण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(६) असल्यास, अपिल इतका प्रदीर्घ काळ प्रलंबित ठेवण्याची कारणे कोणती आणि हे अपिल केव्हा पर्यंत निकाली काढण्यात येणार आहे ?

**श्री. सुभाष देशमुख (०३-१०-२०१७) :** (१) होय.

श्री. यशवंत बागडे, विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, नागपूर यांनी नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत सन २००२ साली झालेल्या आर्थिक घोटाळ्याची चौकशी पूर्ण करुन चौकशी अहवाल दिनांक २८/११/२०१३ रोजी सादर केलेला आहे.

(२) अंशत: खरे आहे.

श्री. बागडे यांनी केलेल्या चौकशीत श्री. सुनिल केदार, माजी अध्यक्ष यांचेवर रु. १,२६,७७,७८,०००/-, श्री. अशोक चौधरी, माजी सरव्यवस्थापक यांचेवर रु. २५,४०,५२,०००/-, सौ.आशाताई महाजन-माजी उपाध्यक्ष, श्री. शामराव धवड, सौ. कुसूमबाई किंमतकर, श्री.मोरबाजी निमजे, श्री.रमेश निमजे आणि श्री.संतोष चोरे सर्व माजी संचालक यांचेवर प्रत्येकी रु.१०००/- मुळ दायित्व निश्चित केलेले आहे.

(३) होय.

श्री.बागडे, चौकशी अधिकारी यांनी दिनांक २८/११/२०१३ रोजी दिलेल्या अंतिम आदेशानुसार उपरोक्त रक्कम या आदेशाचे तारखेपासून एक महिन्याच्या आत, त्यावरील दिनांक १३/०५/२००२ या तारखेपासून रक्कम प्रत्यक्षात बँकेत भरणा करण्याच्या तारखेपर्यंत द.सा.द.शे. १२% व्याजासह बँकेत नगदीने किंवा क्रॉस्ड डिमांड ड्राफ्ट द्वारे जमा करावी असे निर्देश दिले आहेत.

(४) होय.

श्री. सुनिल केदार यांनी मा.मंत्री (सहकार) यांचेकडे या आदेशाविरुध्द अपील क्र. ८९१/२०१३ दाखल केले होते.

(५) नाही.

सद्य:स्थितीत सदरील अपील क्र.८९१/२०१३ प्रलंबित नसून तत्कालीन मा.मंत्री (सहकार) यांचे दिनांक १४/०६/२०१४ च्या आदेशानुसार सदरील अपील

अंशत: मान्य करण्यात आले असून प्रतिवादी क्र.२ प्राधिकृत अधिकारी, नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., नागपूर यांचे दिनांक २८/११/२०१३ रोजीच्या दोषारोप पत्रातील मुद्दा क्र. १, २, ५, ६ व ७ पूर्णपणे रद्द करण्यात आलेले आहेत.

(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**शासनाने अदानीच्या वीज दरवाढीला मंजूरी दिल्याबाबत**

**(२) ८२७० (३१-०७-२०१५). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने अदानीच्या वीज दरवाढीला मंजूरी दिली आहे काय,

(२) सदर वीज दरवाढीमुळे नागरीकांवर किती भूर्दंड पडणार आहे,

(३) प्रति युनिट किती अधिभार असणार आहे,

(४) अदानी समुहाने वीज दरात वाढ करण्यासाठी कोणती १४ कारणे दिली आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (०४-१०-२०१७) :** (१), (२), (३) व (४) कोणत्याही वीज निर्मिती प्रकल्पातून निर्माण होणाऱ्या वीजेचे दर ठरविण्याचे अधिकार महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगास आहेत. महावितरण व अदानी कंपनी यांच्यामध्ये ३०८५ मॅ. वॅ. इतक्या वीज खरेदीकरिता करार झालेला आहे. अदानी कंपनीने कायद्यात बदल, कोळसा वितरण धोरणातील बदल, लोहारा कोळसा ब्लॉक रद्दीकरण या कारणांसाठी या आयोगाकडे वीज दरवाढ याचिका दाखल केल्या होत्या. त्यापैकी कायद्यात बदल याकरिता वीज दरात वाढ मिळण्याकरिता अदानी समुहाने दिलेली १४ कारणे खालीलप्रमाणे आहेत :-

१. कोळशावर स्वच्छ ऊर्जा कर लागू.
२. कोळसा उत्पादन शुल्क लागू.
३. केंद्रिय उत्पादन शुल्क गणनेकर शुल्क रॉयल्टी आणि इतर राज्य करांचा समावेश.

४. सेवा कर, शैक्षणिक उप कर आणि उच्च शैक्षणिक उप कराची एकूण वाहतूक व रेल्वे माल वाहतूकीवर आकारणी.

५. सेवा कर दर बदल.

६. कामे करार कर वाढ.

७. कोळशावरील मानधन बदल.

८. नफ्यावरील किमान पर्यायी कराची वाढ.

९. भारतीय रेल्वेद्वारे कोळसा वाहतूक विकास अधिभार.

१०. कोळसा वाहतूकीवर व्यस्थ हंगामी अधिभार.

११. कोळसा वन कर आकारणी.

१२. GCV आधारीत किंमतीवरील बदल.

१३. वाहतूक दरावर इंधन समायोजन शुल्क आकारणी.

१४. भूपृष्ठावरील वाहतूकीच्या शुल्कावर वाढ.

यापैकी कायद्यात बदल या याचिकेबाबत महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाने काही कारणे मंजूर केली आहेत व त्यापोटी महावितरण कंपनीच्या ग्राहकांवर पडणारा आर्थिकभार ०४ पैसे युनिट इतका आहे.

उर्वरित याचिका APTEL व MERC कडे प्रलंबित आहेत.

---

**सन २००५ पूर्वी पित्याचे निधन झालेल्या महिलांना वडिलोपार्जीत संपत्तीला मुकावे लागणाऱ्या अन्यायकारक निर्णयाची अंमलबजावणी न करण्याबाबत**

**(३) १५४६८ (०२-०५-२०१६). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.संजय दत्त, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २००५ पूर्वी ज्या महिलांच्या पित्याचे निधन झाले आहे त्यांना वडिलोपार्जीत संपत्तीला मुकावे लागेल असा निर्णय मा.सर्वोच्च न्यायालयाने दिला असल्याचे माहे जानेवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निष्कर्ष महिलांसाठी अन्यायकारक असल्याने या निर्णयाची अंमलबजावणी न करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१४-०९-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे.

हिंदू वारसा अधिनियम, १९५६ मधील कलम ६ मध्ये केंद्र शासनाने सन २००५ मध्ये दुरुस्ती केली असून त्यानुसार पित्याच्या संपत्तीमध्ये जन्माने वारसाहक्क मिळण्यास त्याची मुलगी पात्र असेल अशी सुधारणा केली आहे. या अधिनियमानुसार सन २००५ पूर्वी केवळ मुलगा हाच कायदेशीर वारसाहक्क प्राप्त होता.

केंद्र शासनाचा वरील दुरुस्ती अधिनियम दिनांक ०९/०९/२००५ पासून अस्तित्वात आला असल्याने त्या दिनांकापासून ज्या महिलांच्या पित्याचे निधन झाले त्यांना वडिलोपार्जीत संपत्तीत जन्माने वारसाहक्क प्राप्त झाला आहे.

(२) याअनुषंगाने हिंदू वारसा अधिनियम, १९५६ मध्ये आवश्यक ती सुधारणा करण्यास्तव महिला व बाल विकास विभागाच्या दिनांक २७/०१/२०१६ च्या पत्रान्वये केंद्र शासनास कळविण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**राज्यात वैद्यकीय अभ्यासक्रमाच्या बोगस डॉक्टर व अनधिकृत संस्था मोठ्या प्रमाणात असल्याबाबत**

**(४) १७०१० (२९-०४-२०१६). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त : तारांकित प्रश्न क्रमांक ११२८९ ला दिनांक १४ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात बोगस डॉक्टर, मान्यता नसलेल्या वेगवेगळया नावाने चालविल्या जाणाऱ्या वैद्यकीय अभ्यासक्रमाच्या अनधिकृत संस्था इत्यादींची संख्या मोठया प्रमाणात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गेल्या वर्षभराच्या काळात किती बोगस डॉक्टर व संस्था असल्याचे आढळून आलेले आहे व त्यांच्याविरुध्द कोणती कारवाई करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२५-०९-२०१७) :** (१) राज्यात बोगस डॉक्टर आहेत हे अशंत: खरे आहे. तथापि, मान्यता नसलेल्या वेगवेगळ्या नावाने चालविल्या जाणाऱ्या वैद्यकीय अभ्यासक्रमाच्या अनधिकृत संस्था इत्यादींची संख्या मोठ्या प्रमाणात आहे, हे खरे नाही.

(२) बोगस डॉक्टरांविरुध्द तक्रार करण्यासाठी ऑनलाईन तक्रार पोर्टल परिषदेच्या (महाराष्ट्र कौन्सिल ऑफ इंडियन मेडिसीन) www.mcimindia.org.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून आतापर्यंत बोगस डॉक्टरांच्या विरुध्द इतक्या २६२ तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत.

बोगस डॉक्टरांविरुध्द प्राप्त झालेल्या तक्रारीवर कार्यवाही करण्यासाठी शासन निर्णयानुसार संबंधित जिल्हाधिकारी, जिल्हा आरोग्य अधिकारी, महानगरपालिका आयुक्त, नगरपालिका मुख्य अधिकारी व नगरपालिका आरोग्य अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात आल्या आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**कोकणातील जैतापूर अणूऊर्जा प्रकल्पाच्या उभारणीसंदर्भात.**

**(५) १९३५९ (१६-०८-२०१६). अॅड.निरंजन डावखरे, श्री.संजय दत्त, श्री.शरद रणपिसे, श्री.रामहरी रुपनवर : तारांकित प्रश्न क्रमांक १६७१६ ला दिनांक २१ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कोकणातील जैतापुर येथील केंद्र शासनामार्फत उभारण्यात येणाऱ्या विद्युत अणुऊर्जा प्रकल्पाचा पथदर्शक आराखडा तयार करुन प्रकल्प उभारणीचे काम सन २०१७ मध्ये सुरु करण्यात येणार असून त्यासाठी ग्रामस्थांच्या जमिनी संपादित करण्यात आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकल्पासाठी फ्रान्स देशासोबत जैतापूर येथील ६ अणुभट्टी संच उभारण्याची अंमलबजावणी शासनाच्या आरेवा या कंपनीमार्फत करण्यात येणार असल्याचे दिनांक ४ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, आरेवा या कंपनीची ४०० उपकरणे सदोष असल्याचा घोटाळा निदर्शनास आला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, जैतापुर अणूऊर्जा विद्युत प्रकल्प आरेवा कंपनी मार्फत उभारण्याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (११-०९-२०१७)** : (१) अंशत: खरे आहे.
(२) जैतापूर अणूऊर्जा प्रकल्प हा केंद्र शासनाच्या अणूऊर्जा विभागाच्या अखत्यारितील न्युक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लि. या केंद्र शासनाच्या सार्वजनिक उपक्रमामार्फत उभारण्यात येत आहे. सदर प्रकल्पात अणुभट्टीची उभारणी करण्यासाठी ईडीएफ, फ्रान्स या कंपनीकडून वाणिज्यिक व तांत्रिक सहकार्य घेण्यात येत आहे.
(३) अशा प्रकारची माहिती उपलब्ध नाही.
(४) सदरचा प्रकल्प राज्यात केंद्र शासनामार्फत उभारण्यात येत असल्यामुळे केंद्र शासनास पूरक / सहाय्यकारी अशी राज्य शासनाची भूमिका आहे.

---

**अकोला जिल्हा परिषदेतील वर्ग-१ व वर्ग-२ ची मंजूर रिक्त पदे भरण्याबाबत**

**(६) २०१२४ (२०-०८-२०१६). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अकोला जिल्हा परिषदेतील वर्ग १ ची मंजूर पदे ६५ असूनही फक्त ५५ पदे भरण्यात येऊन अदयापी १० पदे रिक्त आहेत तर वर्ग-२ ची मंजूर पदे १८८ असून १२३ पदे भरलेली आहेत व ६५ पदे रिक्त अशी एकूण ७५ पदे रिक्त असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू रिक्त पदे तात्काळ भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-०९-२०१७) :** (१) नाही.

तथापि माहे मे, २०१६ मध्ये अकोला जिल्हा परिषदेमधील वर्ग-१ ची ८ पदे व वर्ग-०२ ची ६० पदे अशी एकूण ६८ पदे रिक्त होती.

(२) व (३) जिल्हा परिषदेतील महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ मधील १ पद जुलै, २०१६ च्या आदेशान्वये भरण्यात आले असून सद्य:स्थितीत प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा हे एक पद रिक्त असून सदर पद पदोन्नती/बदलीने भरण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

सद्य:स्थितीत महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-२ ची ३ पदे भरली असून २ पदे रिक्त आहेत. सदर पदे भरण्याबाबत विभागीय आयुक्त यांचेकडून प्रस्ताव मागविण्यात आला आहे.

महाराष्ट्र विकास सेवा वगळून जिल्हा परिषदेतील इतर वर्ग-१ व वर्ग-२ ची पदे संबंधित प्रशासकीय विभागामार्फत निर्माण करण्यात आली असून ती संबंधीत प्रशासकीय विभागाकडून भरली जातात. जिल्हा परिषदेतील अधिकाऱ्यांची सर्व रिक्त पदे तात्काळ भरण्याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांना सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

---

**केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाने नरेगा-रोहयोला १५० दिवस कामाचा निधी दिल्याबाबत**

**(७) २०२५६ (२०-०८-२०१६). श्री.संजय दत्त, श्रीमती हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाने नरेगा-रोहयोला १०० ऐवजी १५० दिवस कामाचा निधी दिला परंतु कामावर आलेल्या मजूर कुटूंबापैकी फक्त १५ टक्के मजूर कुटूंबांना याचा लाभ मिळू शकला, ५० टक्क्यापेक्षा जास्त मजूर कुटूंबाना १०० दिवसाचा रोजगार मिळाला नसल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कामाची मागणी असूनही ६८ टक्के गावांतून कामे सुरू

करण्यात आली नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. जयकुमार रावल (२१-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

राज्यातील दुष्काळी परिस्थिती पाहता जे कुटुंब १०० दिवसांपेक्षा जास्त दिवस काम करण्यास ईच्छुक आहेत अशा सर्व कुटुंबांना रोजगार पुरविण्यात आलेला आहे.
(२) व (३) हे खरे नाही.

ग्राम रोजगार दिवस, Helpline वर कामाची मागणी नोंदविणे, ग्राम सभा बोलावणे, गावोगावी जावून प्रचार प्रसिध्दी करणे ई. मार्गाने मजुरांना मनरेगाच्या कामावर येण्यास प्रोत्साहीत केले जात आहे.
(४) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

**राज्यात मनरेगा योजनेंतर्गत निधी प्राप्त होण्याबाबत**

**(८) २१९५१ (२०-०८-२०१६). श्री.संजय दत्त :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात महात्मा गांधी रोजगार हमी योजनेमधून सन २०१५-२०१६ मध्ये किती रक्कम केंद्रांकडून राज्याला मिळाली आहे,
(२) असल्यास, आंध्र-कर्नाटक, ओरिसा ह्या राज्यापेक्षा महाराष्ट्राला कमी निधी मिळाला, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, अधिक निधी उपलब्ध होण्याकरिता शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. जयकुमार रावल (२१-०९-२०१७) :** (१) सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात केंद्राकडून राज्याला रु. १२३८३४.७३ लक्ष एवढा निधी प्राप्त झालेला आहे.

(२) हे खरे आहे.
(३) आर्थिक वर्ष २०१५-१६ मध्ये केंद्र शासनाकडे अधिक निधी मिळण्याबाबत मागणी प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आलेला आहे.

निधी मागणी प्रस्ताव हा मागील प्राप्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रासह सादर करण्यात येतो. राज्याला निधी, निर्मित मुनष्य दिवसांच्या तसेच त्या वेळेस असलेल्या प्रलंबित दायित्वाच्या आधारे उपलब्ध करुन दिला जातो.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**परभणी जिल्हा रूग्णालयात राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत झालेल्या औषधे खरेदीबाबत**

**(९) २३५८२ (१६-१२-२०१६). श्री.जयंत पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक १९८९३ ला दिनांक १८ जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्हा रूग्णालयात राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत मिळालेल्या निधीतून खरेदी करण्यात आलेल्या आयुर्वेद व युनानीच्या औषधांची चौकशी करण्याचे आदेश देण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकरणाची चौकशी करण्यासाठी कोणत्या अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आली आहे व संबंधीत चौकशी अधिकाऱ्यांनी चौकशी पूर्ण केली आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२०-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नंदुरबार जिल्हापरिषदेत विविध संवर्गातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१०) २४६७५ (१६-१२-२०१६). श्री.चंद्रकांत रघुवंशी, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नंदुरबार जिल्हापरिषदेत उपमुख्य कार्यकारी अधिकारी, उपअभियंता, शिक्षणाधिकारी अशी असंख्य खातेप्रमुखाची पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, रिक्त पदामुळे सामान्य जनतेच्या शासकीय कामासाठी विलंब होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, नंदुरबार जिल्हापरिषदेतील रिक्त पदे भरण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-०९-२०१७) :** (१) नाही.

तथापि डिसेंबर, २०१६ अखेर काही पदे रिक्त होती.

(२), (३) व (४) नंदुरबार जिल्हा परिषदेतील महाराष्ट्र विकास सेवा गट ब मधील (१) सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नवापूर, (२) सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, शहादा व (३) सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अक्कलकुवा ही ३ पदे रिक्त असून सदर पदांचा अतिरिक्त कार्यभार इतर अधिकाऱ्यांकडे सोपवून नागरीकांची कामे करुन घेतल्या जात आहे. सदर पदे भरणेबाबत तात्काळ कार्यवाही करणेबाबत जिल्हा परिषद, नंदुरबार यांना निर्देश दिलेले आहेत.

महाराष्ट्र विकास सेवा वगळून जिल्हा परिषदेतील इतर वर्ग-१ व वर्ग-२ ची पदे संबंधित प्रशासकीय विभागामार्फत निर्माण करण्यात आली असून ती संबंधीत प्रशासकीय विभागाकडून भरली जातात. जिल्हा परिषदेतील अधिकाऱ्यांची सर्व रिक्त पदे तात्काळ भरण्याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांना सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

---

## सिंधी (ता.उमरी, जि.नांदेड) येथे एक आरोग्य केंद्र असल्याने स्थानिकांची गैरसोय होत असल्याबाबत

**(११) २५८४७ (१६-१२-२०१६). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिंधी (ता.उमरी, जि.नांदेड) येथे एक लाख जनतेसाठी केवळ एकच प्राथमिक आरोग्य केंद्र असल्याने रुग्णांची गैरसोय होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, गोळेगांव किंवा वितनाळ येथे दुसरे प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करावे अशी मागणी स्थानिक नागरीकांनी व लोकप्रतिनिधी यांनी केली असून ते अनेक दिवसांपासून प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या मागणीवर शासनाने निर्णय घेऊन लोकसंख्येनुसार गोळेगांव किंवा वितनाळ येथे प्राथमिक आरोग्य केंद्र स्थापन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२२-०९-२०१७) :** (१) होय, अंशत: खरे आहे.

तथापि, सिंधी, ता.उमरी, जि.नांदेड येथील प्राथमिक आरोग्य केंद्रामार्फत रुग्णांना वैद्यकिय अधिकारी व कर्मचारी यांच्या मार्फत आरोग्य सेवा देण्यात येत आहेत.

(२) व (३) हे खरे नाही.

दिनांक १७/०१/२०१३ च्या शासन निर्णयान्वये गोळेगाव येथे नवीन प्राथमिक आरोग्य केंद्र मंजूर करण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कळंब (जि.उस्मानाबाद) येथील ग्रामीण रुग्णालयास उपजिल्हा रुग्णालयाचा दर्जा मिळवून देण्याबाबत

**(१२) २५९४२ (१६-१२-२०१६). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळंब (जि.उस्मानाबाद) येथील ग्रामीण रुग्णालयास उपजिल्हा रुग्णालयाचा दर्जा मिळवून देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त विचाराधीन प्रस्तावावर अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (२२-०९-२०१७) :** (१) व (२) कळंब, जि. उस्मानाबाद येथील ३० खाटांच्या ग्रामीण रुग्णालयास ५० खाटांचे उपजिल्हा रुग्णालय करण्यास दिनांक ०२/०२/२००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयाच्या इमारतीचे बांधकाम पुर्ण झालेले आहे. तसेच दिनांक ०२/०१/२०१७ च्या शासन निर्णयान्वये पदनिर्मितीच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**पाम (ता.जि.पालघर) ग्रामपंचायतीचे उपसरपंच यांनी द्‌वितीय विवाह केल्याबाबत**

**(१३) २६०७१ (०४-०१-२०१७). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पाम ग्रामपंचायतीचे (ता.जि.पालघर) उपसरपंच कुणाल प्रभाकर पिंपळे यांनी दोन विवाह केल्याने त्यांच्या पहिल्या पत्नी श्रीमती नयना कुणाल पिंपळे यांनी दिनांक ०६/०८/२०१०, १५/१२/२०१३, दिनांक १७/०१/२०१४, दिनांक ०४/०४/२०१४ रोजी वा त्यासुमारास जन माहिती अधिकारी तथा ग्रामसेवक, गट विकास अधिकारी, पंचायत समिती पालघर, यांच्याकडे तक्रार करुन माहिती अधिकार, २००५ अन्वये सदर घटना निदर्शनास आणली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपसरपंच कुणाल प्रभाकर पिंपळे यांनी माहिती लपवून ठेवून संबंधित धारीकामधून अभिलेख गहाळ केल्यामुळे त्यांचेवर कारवाई करणे

कामी माहिती आयुक्त, कोकण खंडपीठ यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, पालघर यांना दिनांक २२/०१/२०१५ व दिनांक २०/०४/२०१५ रोजी वा त्यासुमारास आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच जि.प.पालघर येथील मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी चौकशी सुरु करण्याच्या आत दिनांक २२/०५/२०१६ रोजी उपसरपंच यांनी ग्रा.पं.चे २/३ कर्मचारी यांच्या संगनमताने ग्रा.पं.कार्यालयात रात्रौ १.३० ते २.०० च्या सुमारास आग लावून अभिलेख जाळण्याचा प्रयत्न केला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय व संबंधित दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१९-०९-२०१७) :** (१) पत्रव्यवहार केलेला आहे, हे खरे आहे.

(२) होय. हे खरे आहे

(३) व (४) माहिती आयुक्त, कोकण यांच्या दिनांक २२/०१/२०१५ च्या आदेशानुसार उपसरपंच यांचेवर कारवाई करण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी जिल्हाधिकारी, पालघर यांचेकडे दिनांक २४/०४/२०१५ रोजी पाठविलेला आहे. दिनांक २४/०५/२०१६ रोजी ग्रामपंचायत कार्यालयास आग लागली ही बाब खरी असून सदर प्रकरणी ग्रामपंचायतीने दिनांक २४/०५/२०१६ रोजी FIR (FIR No.I २१/२०१६) दाखल केला आहे.

सदर गुन्ह्यातील अज्ञात आरोपी सापडले नाहीत. त्यामुळे सद्य:स्थितीत सदर गुन्ह्याची नोंद “अ”वर्गात करण्याबाबत मंजूरीसाठीचा प्रस्ताव सागरी पोलीस ठाणे, सातपाटी यांनी दिनांक १८/१०/२०१६ रोजी मा.न्यायालयात सादर केला आहे.

---

### मे. एम.जी. असोसिएट बिल्डर ॲण्ड डेव्हलपर्स या विकासकाने पुनर्विकासानंतर घराचा ताबा न दिल्याबाबत

**(१४) २६७०८ (०४-०१-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जयकृपा हौसिंग सोसायटी (जाफरभाई कांजी चाळ) घोडदेव (मुंबई) यांनी मे. एम.जी. असोसिएट बिल्डर ॲण्ड डेव्हलपर्स श्री. इकबालसिंग मथारु, कलिना, सांताक्रुझ यांना चाळ पुनर्विकासासाठी मान्यता दिली असून त्यांनी सन २००७ पासून पुनर्विकासासाठी कोणतेही कार्यवाही केलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त विकासकाने करारनाम्यातील बाब क्रमांक ७ प्रमाणे दोन वर्षाच्या आत पुनर्विकसित इमारतीमध्ये घर देण्याचे मान्य केले असतानासुध्दा हे पाळले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, संबंधित विकासकाने दिनांक २३ सप्टेंबर, २००८ रोजी वा त्यासुमारास कमिटमेंट प्रमाणपत्र प्राप्त केलेले असतानासुध्दा आजतागायत रहिवाशांना घराचा ताबा देण्यात आलेला नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, रहिवाशांना अद्याप घराचा ताबा न देणाऱ्या विकासकावर स्थानिक पोलीस स्टेशनमध्ये फसवणूकीसंदर्भात गुन्हा दाखल होऊन अद्याप कोणतीच कारवाई करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, संबंधित विकासकावर शासन त्वरीत कारवाई करुन रहिवाशांना घराचा ताबा देणार आहे काय,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२७-०९-२०१७) :** (१), (२) व (३) जयकृपा हौसिंग सोसायटी (जाफरभाई कांजी चाळ) या महापालिका भाडेकरु वसाहतीच्या पुनर्विकासाकरिता सुधार समिती तसेच महापालिका यांचा अनुक्रमे दिनांक १०/०७/२०१७ व १२/०७/२०१७ रोजीच्या ठरावान्वये पुनर्विकासास मान्यता देण्यात आली आहे.

बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत सदर इमारतीस २१ मजल्यापर्यंत मंजुरी तसेच पूर्ण सी.सी. देण्यात आली असून सदर इमारतीचे बांधकाम पूर्ण झाले आहे.

तथापि, विकासकाने अद्यापपर्यंत महानगरपालिकेकडे भोगवटा प्रमाणपत्रासाठी अर्ज केलेला नाही.

(४), (५) व (६) सदर प्रकरणी विकासक श्री. इकबालसिंग मथारु यांचेविरोधात भायखळा पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. ३२७/२०१६, कलम ४०६, ४२० भा.दं.वि.

सह कलम १३ एम.ओ.एफ. अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून, मा.सत्र न्यायालयाने सदर विकासकास जामीन मंजुर केला आहे.

---

**पुणे जिल्हयात जागेअभावी अंगणवाडया बांधल्या नसल्याबाबत**

**(१५) २७०६४ (१७-०४-२०१७). ॲड.जयदेव गायकवाड, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्हयात जागेअभावी अंगणवाडयांसाठी इमारती बांधकामे प्रलंबित असल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर अंगणवाडयांच्या इमारतीसाठी जागा उपलब्ध करुन इमारती बांधणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

(२) उपलब्ध जागेप्रमाणे अंगणवाडी इमारत बांधकामे मंजूर केलेली आहेत. तसेच यासंदर्भात जागा उपलब्ध नसणाऱ्या अंगणवाडी केंद्रासाठी जागा उपलब्ध करणेबाबत पुणे जिल्हयातील सर्व गट विकास अधिकारी व बाल विकास प्रकल्प अधिकारी यांना महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांचेकडून कळविण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**महाराष्ट्र वैद्यक परिषदकडे झालेल्या रुग्णांच्या तक्रारींकडे दुर्लक्ष करण्यात येत असल्याबाबत**

**(१६) २७१९६ (१७-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चुकीच्या निदानामुळे झालेला मन:स्ताप, आरोग्य सेवेपासून वंचित रहावे लागणे, उपचारातील हलगर्जीपणा, आर्थिक भुर्दंड, आरोग्य व्यवस्थेच्या हलगर्जीपणामुळे आलेले शारीरिक अपंगत्व, चुकीच्या उपचारामुळे आलेले गंभीर आजारपण अशा ७५० हून अधिक रुग्णांनी महाराष्ट्र वैद्यक परिषदकडे सन २००५-२०१५ या कालावधीत दाखल केलेली प्रकरणे प्रलंबित असून त्यातील सुमारे ६०० प्रकरणांची प्राथमिक पडताळणीची प्रक्रिया केलेली नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीष महाजन (२१-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही, महाराष्ट्र वैद्यक परिषदेकडे २००५ ते २०१५ या कालावधीत ८४१ तक्रारी प्राप्त झाल्या आहेत. त्यापैकी ३१७ तक्रारी निकाली काढल्या असून ५२४ तक्रारींची प्राथमिक पडताळणी झालेली आहे.

(२) महाराष्ट्र वैद्यक परिषदेच्या स्तरावर प्रलंबित प्रकरणे तातडीने निकाली काढण्याबाबतची कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी-हिंगोली औद्योगिक वसाहतीतील भूखंड ताब्यात घेण्याबाबत

**(१७) २७६३३ (१५-०४-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.अमरसिंह पंडित, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी-हिंगोली जिल्हयातील औद्योगिक वसाहतीतील भूखंडांवर उद्योग सुरु न करणाऱ्या उद्योग चालकांना नोटीस देऊन भूखंड रिक्त करण्याचे आदेश उद्योग विभागाने दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रत्यक्षात उत्पादन न करता केवळ भूखंड घेणाऱ्यांवर तसेच

विना वापर पडून असलेले भूखंड शासनाच्या ताब्यात घेण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (१४-०९-२०१७) :** (१) व (२) हे खरे आहे.

परभणी जिल्ह्यातील परभणी, गंगाखेड व जिंतूर या औद्योगिक क्षेत्रात विहीत विकास कालावधीमध्ये भूखंडावर विकास करु न शकलेल्या व विनावापर पडून असलेल्या २१ भूखंडधारकांना कारणे दाखवा नोटीसा बजावण्यात आलेल्या आहेत. त्यापैकी ९ भूखंड महामंडळाच्या ताब्यात घेण्यात आलेले असून उर्वरित १२ भूखंड ताब्यात घेण्याची कार्यवाही सुरु आहे.

हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली, कळमनूरी व वसमत या औद्योगिक क्षेत्रातविहीत विकास कालावधीमध्ये भूखंडावर विकास करु न शकलेल्या व विनावापर पडून असलेल्या ३० भूखंडधारकांना कारणे दाखवा नोटीसा बजावण्यात आलेल्या आहेत. त्यापैकी ४ भूखंड महामंडळाच्या ताब्यात घेण्यात आलेले असून उर्वरित २६ भूखंड ताब्यात घेण्याची कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महिला व बालविकास विभागांतर्गत खरेदीत अनियमितता व गैरव्यवहार झाल्याबाबत

**(१८) २७६७७ (१५-०४-२०१७). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महिला व बालविकास विभागाच्या माध्यमातून झालेल्या कोटयवधी रुपयांच्या खरेदीमध्ये काही प्रकरणी अनियमितता व गैरव्यवहार झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले असून या प्रकारांना आळा घालण्यासाठी आता खरेदीसाठी धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निर्णयाचे स्वरुप काय आहे, त्याची अंमलबजावणी केव्हापासून करण्यात येणार आहे व यासंदर्भातील सद्य:स्थिती काय आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१४-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

सदर खरेदीत अनियमितता व गैरव्यवहार झालेला नसून महिला व बाल विकास विभागाचे सन २०१४-१५ मध्ये अस्तित्वात आलेल्या नियमानुसार सदर खरेदी झालेली आहे. तसेच राज्य शासनाने दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी नवीन खरेदी धोरण अंमलात आणले आहे.

(२) सदर धोरण दिनांक १६ डिसेंबर, २०१६ रोजी अंमलात आले असून त्यानुसार खरेदी प्रक्रिया राबविण्यात येत आहे.

---

**मालेगांव (जि.नाशिक) येथील पोलीस उपअधिक्षक कार्यालय मौजे निमगांव येथे स्थलांतरीत करणेबाबत**

**(१९) २८००२ (१७-०४-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक १९७१६ ला दिनांक २० जुलै, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालेगांव (जि.नाशिक) तालुक्यातील मौजे निमगांव हे गांव लोकसंख्येच्या व भौगोलिक विस्ताराचे दृष्टीने मोठे असल्याने तसेच या गावाचे राजकीय व सामाजिक महत्व विचारात घेता आणि कायदा व सुव्यवस्थेच्या दृष्टीकोणातून मालेगांव (ग्रामीण) करीता मंजूर व प्रत्यक्ष स्थापित पोलीस उपअधिक्षक (डी.वाय.एस.पी.) यांचे कार्यालय मौजे निमगांव (ता.मालेगांव, जि.नाशिक) येथे स्थलांतरीत करून त्यांचे कार्यक्षेत्र निश्चित करण्यात यावे, अशी मागणी लोकप्रतिनिधी (नाशिक) यांनी दिनांक ५ डिसेंबर, २०१६ रोजी निवेदनाद्वारे मा.मुख्यमंत्री महोदयांकडे केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त कार्यालय स्थलांतरीत करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, शिक्षण व सहकार महर्षि कर्मवीर भाऊसाहेब हिरे यांचे जन्मगांव असलेल्या निमगांव येथे सदरील कार्यालय स्थलांतरीत करणेबाबतची कार्यवाही केव्हापर्यंत होणे अपेक्षित आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१७)** : (१), (२) व (३) मा.लोकप्रतिनिधी (नाशिक) यांचे दिनांक ०५/१२/२०१६ रोजीचे निवेदन दिनांक ०५/०८/२०१७ रोजी प्राप्त करुन घेण्यात आले असून सदर निवेदनाच्या अनुषंगाने पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अभिप्राय मागविण्यात आले आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रायगड जिल्हयामध्ये कुष्ठरोग निर्मुलनासाठी आखण्यात आलेल्या मोहिमेबाबत

**(२०) २८०८९ (१५-०४-२०१७). श्री.जयंत पाटील** : सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रायगड जिल्हयामध्ये दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ ते ४ ऑक्टोबर, २०१६ या कालावधीत घरोघरी जाऊन कुष्ठरोग शोध मोहिम शासनाकडून राबविण्यात आली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रायगड जिल्हयातील किती घरांना भेटी देवून कुष्ठरोग शोध मोहिम पथकाने तपासणी केली आहे, सदर तपासणीमध्ये एकूण किती कुष्ठरोग रूग्ण आढळून आले आहेत,
(३) असल्यास, आढळून आलेल्या कुष्ठरोग रूग्णांवर उपचार करण्यासाठी व कुष्ठरोग नियंत्रणात आणण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०७-०९-२०१७)** : (१) होय, हे खरे आहे.
(२) कुष्ठरोग शोध मोहिम पथकाने एकूण ५,०५,२६० घरांना भेटी देऊन तपासणी केली असता ३२८ नवीन कुष्ठरुग्णांचे निदान करण्यात आले असून त्यांना त्वरीत बहुविध औषधोपचार देण्यात आले.
(३) १) सन २०१६-१७ मध्ये दिनांक १९/०९/२०१६ ते दिनांक ०४/१०/२०१६ या कालावधीत कुष्ठरोग शोध मोहिम" घेण्यात आली. यामध्ये आशा, स्वयंसेवक,

आरोग्य कर्मचारी यांच्यामार्फत घरोघरी जावून प्रत्यक्ष सर्वेक्षण करण्यात आले आहे.

२) ग्रामपंचायतीमध्ये विशेष ग्रामसभा घेऊन "स्पर्श" कुष्ठरोग जनजागृती अभियान दिनांक २६/०१/२०१७ व ३०/०१/२०१७ रोजी राबविण्यात आले. या ग्रामसभेमध्ये कुष्ठरोगाबाबत शास्त्रीय माहिती व शासकीय योजनाबाबतची माहिती ग्रामस्थांना देण्यात आली.

३) राज्यामध्ये दिनांक ०६/०२/२०१७ ते दिनांक २१/०२/२०१७ या कालावधीमध्ये "फोकस लेप्रसी कॅम्पेन" घेण्यात आले.

४) ग्रामीण भागात माहे मार्च, २०१७ मध्ये "हार्ड टू रीच" कार्यक्रम राबविण्यात आला यामध्ये पावसाळयात संपर्क तुटणाऱ्या दुर्गम भागातील गावात आरोग्य शिक्षणाद्वारे जनतेचे सक्षमीकरण करण्यात आले.

५) आशांमार्फत व शहरी भागात लिंकवर्कर, आरोग्य कर्मचारी यांच्यामार्फत सर्व्हेक्षण करण्यात येत असून निदान झालेल्या कुष्ठरुग्णांना वेळीच बहुविध औषधोपचार (MDT) देण्यात येतो.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**वाकळघर (ता.श्रीवर्धन, जि.रायगड) येथील ग्रामपंचायत हद्दीतील बोअरवेल नादुरुस्त असल्याबाबत**

**(२१) २८५९८ (१२-०४-२०१७). श्री.आनंद ठाकूर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले** : सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाकळघर (ता.श्रीवर्धन, जि.रायगड) येथील ग्रामपंचायत हद्दीत बसविण्यात आलेली बोअरवेल नादुरुस्त व बंद पडलेली असल्याने परिसरातील नागरिकांना पिण्याच्या पाण्याचा प्रश्न निर्माण झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी स्थानिक नागरीकांनी जिल्हाधिकारी रायगड, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड, गटविकास अधिकारी, पंचायत समिती श्रीवर्धन यांच्याकडे दिनांक ३० जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास तक्रारी केल्या असून पाण्याची समस्या सोडविण्यासाठी बंद

पडलेली बोअरवेल सुरु करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड, तसेच गटविकास अधिकारी, श्रीवर्धन यांच्याकडून दुर्लक्ष केले जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. बबनराव लोणीकर (१०-१०-२०१७) :** (१) मौजे वाकळघर ता.श्रीवर्धन, जि.रायगड या ठिकाणी बसविण्यात आलेला एका विंधन विहीरीवरील वीज पंप कायमस्वरुपी बंद आहे. परंतु या गावासाठी पिण्याच्या पाण्याकरीता ४ साध्या विहीरी, १ उद्भव विहीर व ३ विंधन विहीरींपैकी २ विंधन विहीरी सुस्थितीत असून पाणीपुरवठा सुरळीत सुरु आहे.
(२) हे खरे नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही. शासनामार्फत ग्रामस्थांना पिण्याच्या पाण्याची वेळोवेळी व्यवस्था केलेली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**भालेर (जि.नंदुरबार) एम.आय.डी.सी.ला पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत**

**(२२) २८९८० (१५-०४-२०१७). श्री.चंद्रकांत रघुवंशी : तारांकित प्रश्न क्रमांक २४६६४ ला दिनांक ५ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भालेर (जि.नंदूरबार) येथे एम.आय.डी.सी. मंजूर होऊनही मागील ३ वर्षात एम.आय.डी.सी. ला कोणत्याही पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यात आल्या नाहीत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त एम.आय.डी सी.चा विस्तार करण्याचे मा.उदयोग मंत्री यांनी आश्वासन देऊनही याबाबत कोणतीच कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त एम.आय.डी.सी. ला सोई-सुविधा उपलब्ध करुन

देऊन कार्यान्वित करण्यासाठी शासनाने कोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (०६-०९-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

भालेर (जि.नंदुरबार) औद्योगिक क्षेत्राच्या एकूण ६४७.४१ हेक्टर क्षेत्रापैकी २८५.५८ हेक्टर क्षेत्राचा ताबा प्राप्त झालेला आहे. ताबा क्षेत्रासाठी पायाभूत सुविधा तसेच कायमस्वरुपी पाणीपुरवठा करण्याचे काम प्रगतीपथावर आहे.
(२) व (३) हे अंशत: खरे आहे.

एकूण प्रस्तावित क्षेत्रापैकी खाजगी क्षेत्र महामंडळाच्या ताब्यात घेण्यात आलेले नसल्याने विकास कामे टप्याटप्याने तसेच प्रथम टप्यातील विकास कामे लवकरच पुर्ण करण्याचे प्रस्तावित आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**औरंगाबाद ऑरिक सिटी येथील भूखंड विक्रीसाठी खुले करण्याबाबत**

**(२३) २९०४९ (१५-०४-२०१७). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद ऑरिक सिटीतील बिडकीन इंडस्ट्रीयल पार्कमधील भूखंड शासनाने उद्योगांसाठी खुले केले असून येथे १ हजाराहून अधिक उद्योग इच्छुकांनी ४३ एकरावरील ४९ भूखंडावर उद्योग उभारण्यास पसंती दर्शविल्याचे माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाने बिडकीन येथील ३ हजार हेक्टर जागेसाठी भूसंपादनासाठी रुपये १,८२५ कोटी गुंतवणूक केली असून त्यातून कोणतेही उत्पन्न शासनास मिळत नसल्याने सदर भूखंडांचे ले आऊट करुन ते उद्योजकांना विक्रीसाठी खुले करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (०६-०९-२०१७) :** (१) हे अंशत: खरे आहे.

ऑरिक सिटीमध्ये बिडकीन व शेंद्रा असे दोन नोड असून बिडकीन क्षेत्राचे भुखंड वाटप करण्यात आलेले नाही. मात्र शेंद्रा येथे प्लॉटसाठी अर्ज मागविण्यात आले आहे. त्यापैकी ३५ प्लॉटसाठी दाखल झालेल्या ७३ अर्जांपैकी २४ प्लॉटचे वाटप करण्यात आले आहे.

(२) हे खरे नाही.

बिडकीन येथे संपादित जमिनीवर मास्टरप्लॅन पुर्ण झालेला असून पहिल्या टप्प्यात १०१६ हेक्टर क्षेत्रावर पायाभुत सुविधांचा कार्यक्रम आदेश दिलेला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**बीड जिल्हयातील वाढती कुपोषित बालकांच्या संख्येला प्रतिबंध करण्याबाबत**

**(२४) ३०५५२ (१५-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड जिल्हयात माहे फेब्रुवारी, २०१० मध्ये वा त्यादरम्यान सुमारे ६५ कुपोषित बालके आढळुन आली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बीड शहरातील अंकुशनगर, इस्लामपुरा या भागात तीन कुपोषित बालकांवर जिल्हा रूग्णालयात उपचार करण्यात आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बीड जिल्हयात वाढती कुपोषित बालकांची संख्या लक्षात घेवुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१४-०९-२०१७) :** (१) होय.

(२) बीड जिल्हयातील अंकुशनगर भागात कोणत्याही बालकांवर जिल्हा रुग्णालयात उपचार करण्यात आलेले नाहीत. तर ईस्लामपूरा या भागातील

शेख रुबीना अमजद या बालिकेला माहे मार्च, २०१७ मध्ये गोवर झाल्यामुळे जिल्हा रुग्णालयामध्ये उपचारासाठी दाखल करण्यात आले होते. उपचार पूर्ण करण्यात येऊन तिला घरी पाठविण्यात आले.

(३) एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत अंगणवाडी केंद्रामार्फत अंगणवाडी कार्यक्षेत्रातील ० ते ५ वर्षे वयोगटातील बालकांची नियमित वजने घेऊन श्रेणी काढली जाते. तीव्र कुपोषित बालकांच्या घरी नियमित गृह भेटी देऊन त्यांच्या आहार व आरोग्याबाबत संनियंत्रण केले जाते. तसेच अशा बालकांना संदर्भ सेवेसाठी जिल्हा रुग्णालयामध्ये पाठविण्यात येते. अंगणवाडी केंद्रातील अशा तीव्र कुपोषित बालकांना अतिरिक्त पोषण आहार घरपोच दिला जातो.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मौजे लोहारा, पांगरी व भोयर (ता.जि.यवतमाळ) येथील जमिनी नियमबाह्यरित्या भूसंपादन केल्याबाबत**

**(२५) ३०६५० (१२-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे लोहारा, पांगरी व भोयर येथील भूसंपादन प्रकरण क्र.१/६५/९४-९५ (ता.जि.यवतमाळ) अतिरिक्त औद्योगिक क्षेत्रापैकी लोहारा व पांगरीची अ-वर्ग नगरपरिषद हद्दीजवळील अकृषिक दर्जाची जमीन नियमबाह्यरित्या संपादीत केल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तदनुसार शासनाच्या १५ वर्षाच्या जमीन वापराच्या निर्णयानुसार संपादीत केलेली जमीन संबंधितांना परत करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (०३-१०-२०१७) :** (१) व (२) हे खरे नाही.

यवतमाळ जिल्ह्याचे औद्योगिक विकासाच्या दृष्टीने यवतमाळ

औद्योगिक क्षेत्राचा विस्तार करण्यासाठी औद्योगिक क्षेत्रालगतची मौजे लोहारा, पांगरी व भोयर येथील ४३९.८५ हे. आर जमीन संपादित करण्यात आली आहे.

औद्योगिक विकासाकरीता संपादित करण्यात आलेल्या जमिनी या चुकीने व जबरदस्तीने संपादित करण्यात आलेल्या नाहीत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मानेगाव-ढेबेवाडी (जि.सातारा) या रस्त्यावरील झाडे व धोकादायक विजेचे खांब हटविण्याबाबत**

**(२६) ३१०८६ (०६-०८-२०१७). श्री.आनंदराव पाटील, श्री.संजय दत्त, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मानेगाव-ढेबेवाडी (जि.सातारा) या रस्त्यावरील झाडे, विजेचे खांब धोकादायक असून ते अपघातास कारणीभूत ठरत असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर रस्त्यावरील विजेचे खांब, झाडे हटविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२५-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) रस्त्याचे रूंदीकरण करताना रूंदीकरणामध्ये येणारी झाडे वन विभागाची परवानगी घेऊन काढण्यात आली असून, विजेचे खांब हटविण्याचे काम प्रगतीत आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**खंडणी मागणाऱ्या टंकलेखकावर कारवाई करण्याबाबत**

**(२७) ३१०९४ (११-०८-२०१७). श्री.धनंजय मुंडे, श्री.जयवंतराव जाधव, श्री.सुनिल तटकरे, श्री.हेमंत टकले, श्री.अमरसिंह पंडित, श्री.किरण पावसकर, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) विदर्भातील वाळू ठेकेदाराला कारवाईची धमकी देणाऱ्या मा.पर्यावरण मंत्री यांच्या टंकलेखकाला माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान अटक करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत मलबार पोलीस स्टेशन मुंबई येथे गुन्हा दाखल करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार ठेकेदाराकडून १० लाखाची खंडणी मागणाऱ्या टंकलेखकावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२९-०९-२०१७) :** (१) होय हे खरे आहे,

(२) व (३) होय, सदर प्रकरणी पोलीस स्टेशन, मलबार हिल येथे गु.र.क्र.४८/२०१७ कलम ३८४, ३४ भा.दं.वि. सं. अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला असून या प्रकरणात दोन आरोपींना अटक करण्यात आली असून न्यायालयाने त्यांना जामीनावर मुक्त केले आहे. सदर गुन्हयाचा तपास चालू आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**नवी मुंबईतील महानगरपालिकेच्या रुग्णालयांमध्ये डायलिसीस खरेदी करण्यासाठी खासदार निधीतून मंजूर झालेला निधी विनावापर परत गेल्याबाबत**

**(२८) ३१५६२ (११-०८-२०१७). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबईतील नेरुळ आणि ऐरोली येथील महानगरपालिकेच्या रुग्णालयांमध्ये डायलिसीस मशीन खरेदी करण्यासाठी खासदार निधीतून मंजूर झालेला निधी ठेकेदारांच्या हितासाठी निविदा प्रक्रिया वेळेत पूर्ण न झाल्यामुळे विनावापर परत गेला असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून संबंधित अधिकाऱ्यांवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२८-०९-२०१७) :** (१) नवी मुंबईतील नेरूळ आणि ऐरोली येथील महानगरपालिकेच्या रुग्णालयांमध्ये डायलिसिस खरेदी करण्यासाठी वेळोवेळी निविदा, फेरनिविदा व मुदतवाढ देऊन देखील स्पर्धात्मक निविदाकार प्राप्त न झाल्याने उपकरणे खरेदी झाली नाहीत व निधी परत गेला.

तथापि, ठेकेदारांच्या हितासाठी निविदा प्रक्रिया वेळेत पूर्ण केली नाही, अशी वस्तुस्थिती नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील आयटीआय संस्थेत विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षणासाठी असलेले वाहन अधिकारी वापरत असल्याबाबत

**(२९) ३१८०४ (११-०८-२०१७). श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील आयटीआय संस्थेत ऑटोमोबाईल या विषयात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षणासाठी पेट्रोलवर चालणाऱ्या वाहनाची आवश्यकता असल्यामुळे सन २०१४-१५ मध्ये शासनाने यासाठी निधी दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या निधीतून घेतलेल्या वाहनाचा उपयोग विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षणासाठी न करता या वाहनाचा तेथील अधिकारी सर्रासपणे वापर करीत

आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, यासंदर्भात शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार संबंधिताविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (२८-०९-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२), (३) व (४) सदर वाहनांचा उपयोग अधिकारी करीत आहेत, हे अंशत: खरे आहे.

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण अंतर्गत +२ स्तरावरील ऑटोमोबाईल टेक्नॉलॉजी या अभ्यासक्रमासाठी शासकीय तांत्रिक विद्यालयाकरीता जिल्हा योजनेंतर्गत वर्ष २०१४-१५ मध्ये १७ वाहने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय स्तरावर उपलब्ध करुन देण्यात आली होती. विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमामध्ये नमूद केल्याप्रमाणे अत्याधुनिक तंत्रज्ञानाचे प्रात्यक्षिक करता यावे याकरीता वाहनांचा उपयोग व्हावा या उद्देशाने सदर वाहने खरेदी करण्यात आली आहेत. त्यानुसार विद्यार्थ्यांना आवश्यक तेव्हा प्रशिक्षण दिले जाते. तथापि, सदर वाहने चालु स्थितीत ठेवण्यासाठी त्याचा नियमित वापर आवश्यक असल्याने, सदर वाहने शासकीय तांत्रिक विद्यालयातील विद्यार्थ्यांना वाहन प्रशिक्षणासाठी आवश्यक असेल तेव्हा वाहने उपलब्ध करुन देण्याच्या अटीवरच संबंधित कार्यालयांना / अधिकाऱ्यांना हस्तांतरीत करण्यात आली होती. परंतु, सदर वाहने विद्यार्थ्यांच्या प्रात्यक्षिकाकरीता खरेदी करण्यात आलेली असतांना, सदर वाहनांचा उपयोग अन्य प्रयोजनासाठी करणे अनुचित असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आल्यानंतर शासनाने अन्य कार्यालयाकडे उपलब्ध करुन दिलेली/वर्ग केलेली वाहने तातडीने परत घेऊन, सदर वाहनांचा वापर ज्या उद्देशाकरीता होणे आवश्यक आहे (विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षणाकरीता) त्याच उद्देशाकरीता करण्यात यावा, तसेच ज्या अधिकाऱ्यांनी सदर वाहने अन्य कार्यालयाकरिता/ अधिकाऱ्याकरिता उपलब्ध करुन दिलेली आहेत/वर्ग केलेली आहेत, त्याबाबत संबंधित अधिकाऱ्यांची जबाबदारी निश्चित करुन या संबंधिचा अहवाल तातडीने शासनास सादर करण्याच्या

सूचना संचालनालयास दिल्या आहेत. तद्अनुषंगाने अन्य कार्यालयांना/ अधिकाऱ्यांना उपलब्ध/ वर्ग करुन दिलेली सर्व वाहने संचालनालयामार्फत परत घेवून ती प्रशिक्षणाकरीता संबंधित संस्थांना उपलब्ध करुन दिलेली आहेत.

---

## तिरोडा (जि.गोंदिया) येथे आधारभूत धान खरेदी केंद्रावर शेतकऱ्यांची फसवणूक झाल्याबाबत

**(३०) ३२२१५ (११-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) तिरोडा (जि.गोंदिया) येथे आधारभूत धान खरेदी केंद्रावर शेतकऱ्यांचे धान खरेदी न करता व्यापाऱ्यांचे धान खरेदी होत असून व्यापाऱ्यांकडून शेतकऱ्यांचे धान खरेदी करताना १ ते १.५ किलो धान जास्त तोलाई होत असल्याने शेतकऱ्यांची फसवणूक होत असल्याचे दिनांक २६ नोव्हेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर प्रकरणाबाबत शेतकऱ्यांची होणारी फसवणूक थांबविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (०६-१०-२०१७) :** (१) हे खरे नाही.

तिरोडा (जि.गोंदिया) येथे हंगाम २०१६-१७ करिता १२ आधारभूत धान खरेदी केंद्र सुरु करण्यात आली होती. तेथे एकूण १०६१ शेतकऱ्यांकडून ३१२०६.१५ क्विंटल धान खरेदी करण्यात आले आहे. कोणत्याही व्यापाऱ्यांकडून धान खरेदी करण्यात आलेले नाही. तसेच धानखरेदी ऑनलाईन पध्दतीने करण्यात आल्याने जास्तीची तोलाई होत असल्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**मुंबई-आग्रा महामार्गावर सोयी-सुविधा उपलब्ध करून देण्याबाबत**

**(३१) ३२४४३ (०७-०८-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे : दिनांक ३ ऑगस्ट, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ४ मधील प्रश्न क्रमांक १८३३३ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई-आग्रा महामार्गाचे चौपदरीकरणाचे काम झाले असले तरी सदरहू महामार्गावर अनेक ठिकाणी अत्यावश्य असलेले भूयारी मार्ग व उड्डाणपुलाची निर्मिती रखडल्याने मागील २ वर्षात आजमितीस २०० पेक्षा अधिक नागरिकांना जीव गमवावा लागला आहे, तसेच पडघा ते लथीपवाडी या रस्त्यांवरील सुमारे ५० ते ६० गावे व परिसरातील हजारो लोकांना महामार्गाच्या चौपदरीकरणातील कोणत्याही सोयी सुविधा नसल्यामुळे गैरसोयीला सामोरे जावे लागत असून महामार्गावरील असुविधेमुळे जिवित हानी होण्याच्या घटना वाढत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू महामार्गावरील वाशिंद जवळील सहाणे-पाली या परिसरात भूयारी मार्गाऐवजी उड्डाणपूलाची आवश्यता असतांना उड्डाणपूल न बांधल्याने त्या परिसरातील १५ ते २० गावातील हजारो ग्रामस्थांना अनेक समस्यांना सामोरे जावे लागत आहे, तसेच, वाडागणेशपूरी वसईकडे जाणाऱ्या वाहनाच्या कोंडीला व अपघाताला सामोरे जावे लागत आहे तसेच कानविंदे व कळम गाव जवळील बायपासही धोकादायक ठरत असून त्या परिसरातील १५ गाव पाडयातील ग्रामस्थांना जीव धोक्यात घालून जावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार मुंबई-आग्रा महामार्गावरील धोकादायक बायपास तसेच उड्डाणपुलाची निर्मिती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (२७-०९-२०१७) :** (१), (२) व (३) मुंबई-आग्रा महामार्गाच्या वडपे ते गोंदे हया १०० कि.मी. महामार्गाच्या चौपदरीकरणाचा प्रकल्प भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण यांच्यामार्फत राबविला जात असून त्यामध्ये मूळ मंजूरीनुसार १३ भूयारी मार्ग व स्थानिकांच्या मागणीनुसार मंजूर वावाव्यतिरिक्त २० ठिकाणी भूयारी मार्ग बांधण्यात आलेले आहेत. उर्वरित नाक्यांवर स्थानिकांकडून उड्डाणपूल/ भुयारी मार्गाची अजूनही मागणी प्राप्त होत असल्याने या महामार्गाच्या प्रस्तावित सहापदरीकरणाच्या प्रकल्पामध्ये स्थानिकांच्या मागण्या विचारात घेण्यात येत असल्याचे प्रकल्प संचालक, भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण, नाशिक यांनी कळविले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील राज्य शासकीय कर्मचारी व अधिकारी यांना वाढीव महागाई भत्ता लागू करण्याबाबत

**(३२) ३२५८८ (११-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील आयएएस, आयपीएस व अन्य अधिकारी यांना दिनांक १ जानेवारी, २०१७ पासून महागाई भत्त्यात दोन टक्के वाढ करण्यात आली परंतु राज्य शासकीय कर्मचारी व अधिकारी यांना महागाई भत्ता लागू केला नसल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, माहे जुलै, २०१६ व जानेवारी, २०१७ मध्ये जाहीर केलेला वाढीव महागाई भत्ता देण्यात यावा अशी मागणी राज्य शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांनी शासनाकडे मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, वाढीव भत्ता देण्याबाबत शासनाकडून निर्णय घेत नसल्याने शासकीय कर्मचाऱ्यांमध्ये नाराजी निर्माण झाली आहे, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शासकीय कर्मचाऱ्यांना वाढीव भत्ता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (११-०९-२०१७) :** (१) होय.
(२) अंशत: खरे आहे.

शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २१ एप्रिल, २०१७ अन्वये दिनांक १ जुलै, २०१६ पासून महागाई भत्त्यात ७ % वाढ करून महागाई भत्ता दर १२५ % वरून १३२ % करण्यात आला आहे.

(३) राज्याची साधनसंपत्ती व आर्थिक स्थिती विचारात घेऊन महागाई भत्तावाढ मंजूर करण्याबाबत वेळोवेळी निर्णय घेण्यात येतो. त्यानुसार दिनांक १ जुलै, २०१६ पर्यंतची महागाई भत्तावाढ मंजूर करण्यात आली आहे. त्यामुळे शासकीय कर्मचाऱ्यांमध्ये नाराजी निर्माण झाली आहे, असे म्हणता येणार नाही.

(४) व (५) राज्याची साधनसंपत्ती व आर्थिक स्थिती विचारात घेऊन महागाई भत्तावाढ मंजूर करण्याबाबत वेळोवेळी निर्णय घेण्यात येतो. त्यानुसार दिनांक १ जानेवारी, २०१७ पासून महागाई भत्त्यात वाढ करण्याबाबत योग्यवेळी निर्णय घेण्यात येईल.

---

## मुंबई महापालिकेने बॉम्बे एज्युकेशन ट्रस्टला दिलेल्या भूखंडाबाबत

**(३३) ३२६२९ (११-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड, श्री.संजय दत्त :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महापालिकेने प्राथमिक व माध्यमिक शाळा बांधण्यासाठी बॉम्बे एज्युकेशन ट्रस्टला दिलेल्या भूखंडावर सुमारे २० वर्षानंतरही ट्रस्टने कोणतेही बांधकाम न केल्याने प्रशासनाने सन २०१५ मध्ये हा भूखंड ताब्यात घेऊन सील ठोकले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अटी व नियमांचा भंग केल्यानंतरही बॉम्बे एज्युकेशन ट्रस्टला नव्या विकास आराखडयात सदरील भूखंड पुन्हा महापालिकेकडून देण्यात आला असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार या प्रकरणी काही गैरव्यवहार झाला

असल्यास संबंधित दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२७-०९-२०१७) :** (१) हे खरे आहे.

(२) बॉम्बे एज्युकेशन ट्रस्ट यांना महानगरपालिकेमार्फत सदर भूभाग पुन्हा देण्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

- सदर भूभाग अतिक्रमित असल्याने महानगरपालिकेमार्फत अतिक्रमणे हटविण्याकरिता बॉम्बे एज्युकेशन ट्रस्ट यांनी महानगरपालिकेविरुध्द मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केली होती.
- सदर ट्रस्टला दिनांक ०१/०७/२०१३ रोजी मक्ता कराराच्या अटी व शर्ती भंगाबाबत कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली होती. परंतु ट्रस्टला सुनावणी देऊन त्यांचे म्हणणे मांडण्याची संधी देण्यात आली नव्हती.
- सदर भूखंड परत घेण्यासंबंधीचा ठराव सुधार समिती/ महानगरपालिकेकडे सादर करण्यात आला नव्हता. तसेच, अतिक्रमण हटविण्याची कार्यवाही न करता महानगरपालिकेने मक्ता करार रद्द केल्यास, सदर प्रकरण महानगरपालिकेच्या विरोधात जाऊ शकले असते. त्यामुळे बॉम्बे एज्युकेशन ट्रस्टला प्रत्यक्ष सुनावणीसाठी बोलावून त्यांचे म्हणणे सादर करण्याची संधी देण्यात आली.
- सदर सुनावणीदरम्यान ट्रस्टतर्फे सदर कारणे दाखवा नोटीस व भूखंड परत घेण्याची कार्यवाही मागे घेतल्यास भूखंडाचे प्रलंबित भाडे देण्याचे तसेच विशिष्ट कालावधीत भूखंड विकसित करण्याचे व प्रलंबित याचिका मागे घेण्याचे प्रस्ताविल्याने त्यांना अंतिम संधी देण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे.

(३) सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत चौकशी करण्यात आलेली नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मोहटादेवी देवस्थान प्रशासनावर कारवाई करणेबाबत

**(३४) ३२६६६ (११-०८-२०१७). श्री.कपिल पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २६७२७ ला दिनांक ५ एप्रिल, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मोहटादेवी देवस्थान (ता.पाथर्डी, जि.अहमदनगर) येथील विश्वस्तांनी जीर्णोद्धार करताना दोन किलो सोन्याची सुवर्णयंत्रे पुरल्याप्रकरणी कारवाई होण्याऐवजी हे प्रकरण उघडकीस आणणाऱ्या लोकमत संपादकाच्या विरोधात गुन्हा दाखल करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबतची सुरु असलेली चौकशी पुर्ण झाली आहे काय, उक्त चौकशीत काय निष्पन्न झाले आहे,

(३) असल्यास, संबंधित प्रकरणी देवस्थान प्रशासनावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२७-०९-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

याबाबत देवस्थानाने लोकमत अहमदनगर आवृत्तीचे संपादक व इतरांविरुध्द खालीलप्रमाणे गुन्हे व प्रकरणे दाखल केली आहेत.

अ) पाथर्डी पोलीस स्टेशन येथील एफआयआर क्र.२९/२०१७

ब) क्रिमीनल दावा एसटीसी क्र.५५४/२०१७ अहमदनगर न्यायालय,

क) आरसीएस १६/२०१७ अहमदनगर न्यायालय.

(२) याबाबत दिवाणी दावा आरसीएस १६/२०१७ मध्ये मा.न्यायालयाने देवस्थानाबाबत कोणतेही बदनामी-कारक वृत्त प्रसिध्द करण्याबाबत मनाई हुकुमाचा आदेश पारित केलेला आहे.

पाथर्डी पोलीस स्टेशन येथील एफआयआर क्र.२९/ २०१७ विरुध्द मा.उच्च न्यायालयात संबंधितांनी याचिका दाखल केली. सदर क्रिमिनल ॲप्लीकेशन नं.४१६/२०१७, दिनांक ०७/०४/२०१७ चे आदेशान्वये फेटाळण्यात आला व संबंधित तक्रारींची पोलीसांमार्फत चौकशी होऊन चार्जशिट दाखल करावे, असा आदेश दिलेला आहे.

(३) याबाबत देवस्थानावर कारवाई केलेली नाही.

संपादकावर देवस्थानने गुन्हा दाखल केला असून सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहेत.
(४) सुवर्णयंत्रांबाबत निरिक्षक चौकशी क्र.११३/२०१६ हा अहमदनगर कार्यालयात प्रलंबित आहे. यासंदर्भात मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे जनहित याचिका क्र.४१/२०१४ दाखल असल्यामुळे यावर अधिक भाष्य करणे योग्य होणार नाही.

---

## अल्पसंख्याक बहुल ग्रामीण भागात पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत

**(३५) ३२६९८ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अल्पसंख्याक बहुल ग्रामीण भागात पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्याच्या योजनेमध्ये २६ कामांचा अनधिकृतपणे समावेश करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन २६ कामांचा अनधिकृतपणे समावेश करणाऱ्या दोषी व्यक्तींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२७-०९-२०१७) :** (१) होय.
(२) अल्पसंख्यांक बहुल ग्रामीण भागात मुलभूत व पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्याच्या योजनेमध्ये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात दिनांक ३१/०३/२०१७ च्या शासन निर्णयामध्ये २६ कामांचा अनधिकृतपणे समावेश करण्यात आला होता. सदर बाब शासनाच्या निर्दशनास आल्याने तात्काळ कार्यवाही करुन शासन मान्यतेने दिनांक २९ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयान्वये सदर २६ कामे रद्द करण्यात आलेली असून दिनांक ०२ जून, २०१७ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये रद्द केलेल्या कामांच्या ऐवजी नवीन कामांना मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर योजनेत २६ अनधिकृत/ मंजूरी प्राप्त नसलेल्या प्रकरणांचा अनधिकृतपणे समावेश झाल्याविषयीच्या प्रकरणाची प्राथमिक चौकशी सुरु आहे. सद्य:स्थितीत या प्रकरणाशी संबंधित कक्ष अधिकारी यांना दिनांक २२/०६/२०१७ च्या शासन आदेशान्वये निलंबित करण्यात आलेले असून त्यांच्या विरुध्द म.ना.से. (शि.व.अ.) नियम १९७९ च्या कलम ८ अंतर्गत विभागीय चौकशी करण्याचे प्रस्तावित आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**प्लॅस्टिक राष्ट्रध्वजाच्या निर्मितीस बंदी आणण्याबाबत**

**(३६) ३२८७२ (११-०८-२०१७). डॉ.अपूर्व हिरे : तारांकित प्रश्न क्रमांक २५८१८ ला दिनांक ७ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) प्लॅस्टिक राष्ट्रध्वजाच्या निर्मितीस पायबंद घालण्याच्यादृष्टीने त्याचे उत्पादक, विक्रेते तसेच वितरक यांच्यावर यथोचित कारवाई करण्याचे निर्देश दिनांक १४ जून, २०१४ च्या परिपत्रकान्वये देण्यात आले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्लॅस्टिक राष्ट्रध्वजावर बंदी आणण्याबाबतचा प्रस्ताव केंद्रीय गृह मंत्रालयास पाठविण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राष्ट्रध्वजाची विटबंना रोखण्याच्या अनुषंगाने प्रस्तुत प्रस्तावाबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय.

(३) राष्ट्रध्वजाचा उचित सन्मान राखण्यासाठी आवश्यक उपाययोजना करण्याच्या सूचना शासनाने दिनांक १४/६/२०१४, दिनांक ०१/०१/२०१५ व दिनांक २२/४/२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**हिंगणा (जि.नागपूर) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या परिसरातील झोपडीधारक हक्कांपासून वंचित असल्याबाबत**

**(३७) ३२९२५ (१८-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) हिंगणा (जि.नागपूर) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या परिसरातील १९६० पासून राज्य शासनाच्या व केंद्र शासनाच्या खडक व झुडपी जंगलाच्या जागेवर असलेले झोपडीधारक हे त्यांच्या हक्कांपासून वंचित आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर झोपडपट्टीधारकांना त्यांचे हक्क देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुभाष देसाई (२६-०९-२०१७) :** (१) नागपूर जिल्ह्यातील नागपूर (हिंगणा) औद्योगिक क्षेत्राची स्थापना सन १९६४ ला झाली असून सदर क्षेत्र १९७० पासून कार्यान्वित झालेले आहे. तथापी सन १९६० पासून राज्य शासनाच्या खडक व झुडपी जंगलाच्या जागेवर अतिक्रमण असून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने संपादित केलेल्या जागेवर नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यातील पुजाऱ्यांच्या अनुदानात वाढ करण्याबाबत**

**(३८) ३२९८३ (११-०८-२०१७). श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील देवस्थानामध्ये पुजारी म्हणून काम करणाऱ्या पुजाऱ्यांना पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांच्या कार्यकाळापासून ते आजपर्यंत फक्त रुपये २९ एवढे वार्षिक अनुदान मिळते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, देवस्थानाचे अर्चक म्हणून नाव लावणेबाबत व अनुदानाची

रक्कम वाढवून मिळणेबाबत अपर जिल्हाधिकारी, नंदुरबार यांनी कार्यासन अधिकारी, महसूल व वन अधिकारी यांना दिनांक १५ जानेवारी, २०१३ रोजी वा त्यासुमारास निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, देवस्थानामधील पुजाऱ्यांचे अनुदानात वाढ करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२६-०९-२०१७) :** (१) हे खरे नाही.

काही देवस्थानामध्ये राज्य शासनाच्या कर्मचाऱ्या प्रमाणे ६ व्या वेतन आयोगानुसार वेतन व भत्ते दिले जातात. तर काही देवस्थानामध्ये कंत्राटी स्वरुपात ठोक मासिक मानधन दिले जाते. स्थानिक पातळी वरील देवस्थानांच्या उत्पन्नाप्रमाणे त्या-त्या ठिकाणी कार्यरत असणाऱ्या पुजाऱ्यांना मानधन दिले जाते.
(२) देवस्थानचे अर्चक म्हणून नाव लावण्याबाबत व अनुदानाची रक्कम वाढवून मिळणेबाबत अपर जिल्हाधिकारी, नंदुरबार यांचे दिनांक १५/०१/२०१३ चे मूळ निवेदन कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग यांना प्राप्त झाल्याचे दिसून येत नाही. तथापि, जिल्हाधिकारी, नंदुरबार यांच्या दिनांक १५/०१/२०१३ रोजीच्या पत्राची प्रत आपले सरकार पोर्टल व पी.जी. पोर्टलद्वारे प्राप्त झालेली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**राज्यात ग्रामस्तरावर ग्रामरक्षक दल स्थापन करण्याबाबत**

**(३९) ३३२२२ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **राज्य उत्पादन शुल्क मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने ग्रामस्तरावर ग्रामरक्षक दल स्थापन करण्याचे आदेश दिले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील किती गावांकडून ग्रामरक्षकाचे प्रस्ताव शासनाकडे सादर करण्यात आले आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन ग्रामरक्षक दल स्थापनेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रशेखर बावनकुळे (२८-०९-२०१७)** : (१) होय. राज्यात ग्रामस्तरावर ग्रामरक्षक दल स्थापन करण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र दारुबंदी कायदा, १९४९ मध्ये सुधारणा करून महाराष्ट्र दारुबंदी (सुधारणा) अधिनियम, २०१६ लागू करण्यात आला आहे.
(२) व (३) सध्या केवळ अहमदनगर जिल्हयात ग्रामरक्षक दल स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला असून, जिल्हयातील ५१७ गावांनी ग्रामरक्षक दल स्थापनेसाठी अर्ज सादर केले आहे. यापैकी ६ ग्रामपंचायतीमध्ये ग्रामरक्षक दलाची स्थापना करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**पोलिसांचे बोधचिन्ह असलेली जुन्या खाकी वर्दीची बाजारात विक्री होत असल्याबाबत**

**(४०) ३३४१६ (११-०८-२०१७). श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.नरेंद्र पाटील, श्री.आनंद ठाकूर, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.जयवंतराव जाधव, श्री.अमरसिंह पंडित :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील विक्रोळी येथील बाजारात महाराष्ट्र पोलिसांचे बोधचिन्ह असलेली जुनी खाकी वर्दी केवळ २०० रुपयात जुने कपडे विक्रेत्यांकडे मिळत असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार महाराष्ट्र पोलिसांचे बोधचिन्ह असलेली खाकी जुनी वर्दी बाजारात विकली जाऊ नये म्हणून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०४-१०-२०१७) :** (१) होय.
(२) प्रस्तुत प्रकरणी विक्रोळी पोलीस ठाणे येथे भा.दं.वि. कलम १७१ अन्व्ये गुन्हा दाखल करण्यात आला असून, आरोपीस अटक करण्यात आली व पोलिसांचा बोधचिन्ह असलेला शर्ट जप्त करण्यात आला आहे. आरोपीने सदरचा शर्ट जुने कपडे विकणाऱ्या इसमाकडून घेतल्याचा कबुली जबाब दिला. भविष्यात पोलिसांचा बोधचिन्ह असणारा शर्ट न विकण्याबाबत जुने कपडे विक्रेत्यांना समज देण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पतंजली आयुर्वेद कंपनीला फूड पार्क उभारण्यासाठी राज्य शासनाने जमीन सवलतीच्या दराने दिल्याबाबत

**(४१) ३३४९५ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) योगगुरु रामदेव बाबा यांच्या पतंजली आयुर्वेद कंपनीला फूड पार्क उभारण्यासाठी राज्य शासनाने नागपूर विमानतळाजवळ सुमारे ६०० एकर जमीन सवलतीच्या दराने दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात जमीन हस्तांतरण प्रक्रियेत संशयास्पद व्यवहार झाल्याने मा.मुख्यमंत्री यांनी हस्तक्षेप केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तदनुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०७-१०-२०१७) :** (१) पतंजली उद्योग समुहाला सेझ (विशेष आर्थिक क्षेत्र) मध्ये १०६.११ कर तर सेझ बाहेरील क्षेत्रामध्ये २३४.१५ एकर अशी एकूण ३४०.२६ एकर जागा देण्यात आली आहे. विशेष आर्थिक क्षेत्रातील विकसित भूखंड हे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या बोर्डाने

मंजूर केलेल्या नियोजित दराने देण्यात येतात. त्याचप्रमाणे पतंजली उद्योग समुहाला सेझ मधील भूखंड देण्यात आलेला आहे. सेझ बाहेरील क्षेत्रातील भूखंड हे ई-निविदा (E Tender) पध्दतीने देण्यात येतात. त्यानुसार जून, २०१६ मध्ये ई-निविदा काढण्यात आली मात्र २ वेळा निविदा काढूनही अपेक्षित प्रतिसाद मिळाला नाही. त्यामुळे तिसऱ्यावेळी आलेल्या प्रतिसादानुसार पतंजली उद्योग समुहाला सदरहू भूखंड आवंटित करण्यात आला.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

### शासनाच्या विविध विभागांनी राष्ट्रीयकृत बँकांमध्ये ठेवी ठेवल्याबाबत

**(४२) ३३५३३ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाच्या विविध विभागांनी राष्ट्रीयकृत बँकामध्ये डिपॉझिट म्हणून नेमकी किती रक्कम ठेवली आहे याची माहिती वित्त विभागाने घेतली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विविध विभागांनी किती रक्कम राष्ट्रीयकृत बँकामध्ये ठेवली आहे, नॉन बँकिग फायनान्स कॉर्पोरेशन स्थापन करुन त्यात सदरहू रक्कम जमा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, पीएलए खात्यांची माहिती गोळा करण्याचे काम सुरु असून पीएलए खात्यातील रक्कमेचे कशा प्रकारे नियोजन करण्यात येणार आहे,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. सुधीर मुनगंटीवार (११-०९-२०१७) :** (१) बँक डिपॉझिटची माहिती राज्य शासनाच्या विविध विभागाकडून संकलित करण्यात येत आहे. परिपूर्ण माहिती वित्त विभागाकडे उपलब्ध नाही. याबाबत ज्या विभागांनी पुरवणी मागण्या सादर केल्या आहेत त्यांचेकडून क्र. पूरक २०१७/प्र.क्र.१००/अर्थसंकल्प-३, दिनांक ४ जुलै, २०१७ च्या परिपत्रकान्वये

विभागांतर्गत सर्व बँक खात्यामधील निधीची माहिती मागविली आहे.

(२) याबाबतची परिपूर्ण माहिती उपलब्ध करुन घेण्यात येत आहे.

नॉन बँकिंग फायनान्स कॉर्पोरेशन स्थापन करुन त्यात शासनाच्या विविध विभागांनी राष्ट्रीयकृत बँकामध्ये डिपॉझिट म्हणून ठेवलेली रक्कमा जमा करण्याबाबतचा कोणताही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन नाही.

(३) स्वीय प्रपंजी लेख्यासंबंधातील (P.L.A.) खात्याची माहिती नियमितपणे "अर्थवाहिनी" प्रणाली उपलब्ध आहे. (P.L.A.) खात्यावरील रक्कमा या पुर्वनियोजित कामासाठी असल्यामुळे, त्यांचे नियंत्रण संबंधित विभागामार्फत करण्यात येते.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**उल्हासनगर (जि.ठाणे) येथे एका महिलेवर रॉकेल ओतून तिला जिवंत जाळण्यात आल्याबाबत**

**(४३) ३३७९३ (११-०८-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उल्हासनगर (जि.ठाणे) येथे एका महिलेवर रॉकेल ओतून तिला जिवंत जाळण्यात आले असल्याचे दिनांक २२ मार्च, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोषीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१८-०९-२०१७) :** (१) दिनांक २४/२/२०१७ रोजी फिर्यादीने दिलेल्या फिर्यादीनुसार मौजे उसाटणे ता.अंबरनाथ जि.ठाणे येथे एक महिला जळून मरण आलेबाबत हिललाईन पोलीस ठाणे उल्हासनगर येथे अकस्मात मृत्यूची रजिस्टर मध्ये नोंद आहे.

(२) प्रथम अक.मृत्यु नं. १५/१७ सीआरपीसी १७४ प्रमाणे गुन्हा आला. त्यानंतर, चौकशीअंती गु.रजि नं ११६/१७ भादंवि क्र. ३०२, ४९८(अ), ३०४(ब), ५०४, ५०६, ३४ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आलेला आहे. सदर गुन्ह्यातील ४ आरोपीनी मा.अति जिल्हा व सत्र न्यायालय, कल्याण येथे अटकपुर्व जामिन मिळणेकरीता अर्ज करण्यात आलेला आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**भांडूप (मुंबई) येथील एका सुशिक्षित तरुणाची नायजेरियन दाम्पत्याने फसवणूक केल्याबाबत**

**(४४) ३३७९९ (११-०८-२०१७). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) भांडूप (मुंबई) येथील एका सुशिक्षित तरुणाला वनौषधी बियांच्या विक्रीच्या नावाखाली लाखो रुपयांची फसवणूक केल्याप्रकरणी एका नायजेरियन दाम्पत्याला दिल्ली पोलिसांनी अटक केली असल्याचे माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर दाम्पत्याला मुंबई पोलिसांनी आपल्या ताब्यात घेऊन त्यांच्यावर न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (२८-०९-२०१७) :** (१) अंशत: खरे आहे. सदर प्रकरणी प्राप्त फिर्यादीनुसार भांडूप पोलीस स्टेशन येथे गु.र.क्र. ५२३/ १६ भा.दं.वि. कलम ४२०, ३४ सह माहिती तंत्रज्ञान अधिनियम कलम ६६ (ड) अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला आहे.
(२) सदर प्रकरणांत एकुण ६ आरोपिंना अटक केली असुन, त्यांचेविरुद्ध मा.न्यायालयात दोषारोपपत्र दाखल कले आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## उस्मानाबाद जिल्हयात अनधिकृतपणे पाणीवाटप करणाऱ्या प्लांटवर कारवाई करण्याबाबत

**(४५) ३४०८३ (११-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उस्मानाबाद जिल्हयात अनधिकृतपणे पाणीवाटप करणाऱ्या प्लांटनी कोणत्याही नियमांचे पालन न केल्याने अन्न व औषध प्रशासनाने नोटीस बजावल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दोषी प्लांटची नांवे काय आहेत तसेच शहरातील किती अनधिकृत व्यवसाय करणाऱ्या प्लांटना नोटीस बजावण्यात आली वा येत आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोषी असणाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. गिरीश बापट (११-१०-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) उस्मानाबाद जिल्हयात कोल्ड जारची विक्री करणाऱ्या खालील २१ प्लांट धारकांना व्यवसाय बंद करण्याबाबत नोटीस पाठविण्यात आली आहे.

१. सार्थक, एंटर प्राईजेस, उस्मानाबाद.
२. श्री जल, उस्मानाबाद.
३. देवकृपा ॲक्वा, उस्मानाबाद.
४. सिनर्जी ॲक्वा, उस्मानाबाद.
५. ओम जल, उस्मानाबाद.
६. लक्ष्मी ॲक्वा, उस्मानाबाद.
७. मयूर जल, बालाजी नगर, उस्मानाबाद.
८. मयूर जल, रामकृष्ण नगर, उस्मानाबाद.
९. मयूर जल, तांबारी विभाग, उस्मानाबाद.
१०. सिध्दी ॲक्वा, उस्मानाबाद.
११. सनशाईन ॲक्वा, उस्मानाबाद.
१२. ॲक्वा गार्ड, उस्मानाबाद.

१३. साहील ॲक्वा, उस्मानाबाद.
१४. गॅलक्सी ॲक्वा, उस्मानाबाद.
१५. ग्लोबल ॲक्वा, उस्मानाबाद.
१६. गणेश ॲक्वा, उस्मानाबाद.
१७. आर आग फ्रेश वॉटर, उस्मानाबाद.
१८. इंडिया कूल वॉटर, उस्मानाबाद.
१९. रॉयल ॲक्वा, उस्मानाबाद.
२०. हतलाई ॲक्वा, उस्मानाबाद.
२१. स्टार गोल्ड, उस्मानाबाद.

(३) उक्त २१ प्लांट धारकांना कोल्डजार द्वारे पाणी उत्पादन व विक्री व्यवसाय बंद करण्याबाबत नोटीस बजावण्यात आली आहे.

सदर २१ व्यवसायीकांची फेरतपासणी करुन अन्न व्यवसाय चालू असल्यास व्यवसायीकांविरुध्द न्यायालयात खटले दाखल करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**खाजगी विनाअनुदानित औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या लेखा परिक्षणाबाबत**

**(४६) ३४०८८ (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) खाजगी विनाअनुदानित औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना अंतर्गत लेखा परिक्षणानंतर संचालनालय स्थापित लेखा परिक्षण मंडळाकडून आपले लेखा तपासणे बंधनकारक आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लेखा परिक्षण मंडळाच्या तपासणीनंतर शुल्क सुधारणा समितीसमोर शुल्क सुधारणेचे प्रस्ताव दाखल करणे बंधनकारक राहिल, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, लेखा परिक्षण मंडळ व शुल्क सुधारणा समिती गठीत करण्याचा अधिकार संचालकांना दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, लेखा परिक्षक, वित्त सल्लागार इत्यादी सदस्य आपल्या मर्जीतील नियुक्त करून संचालनालय स्तरावर गैरमार्गाचा अवलंब केल्या जाण्याची शक्यता असल्याने अंतर्गत लेखा परिक्षणानंतर शुल्क वाढीचा प्रस्ताव सरळ शुल्क सुधार समितीसमोर सादर करण्याची रितसर व्यवस्था शासन स्विकारेल काय,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (२८-०९-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) होय, हे खरे आहे.

(४) खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या शुल्क निश्चिती करण्याची कार्यपध्दती व शुल्क सुधार समितीची रचना दिनांक १४/०५/२०१५ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली असून सदर समिती ही शासन निर्णयातील तरतूदीनुसार असल्याने संचालनालयातील मर्जीतील सदस्य नेमण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

दिनांक १४/०५/२०१५ च्या शासन निर्णयानुसार अंतर्गत लेखा परिक्षणानंतर शुल्क वाढीचा प्रस्ताव संचालनालय स्तरावर निश्चित करावयाचा आहे. तद्नंतर या शुल्क वाढी संदर्भात विद्यार्थी तसेच पालक यांचेकडून तक्रारी प्राप्त झाल्या तरच शुल्क सुधार समिती स्थापन करावयाची आहे. त्यामुळे शुल्क वाढीचा प्रस्ताव सरळ शुल्क सुधारणा समितीसमोर सादर करण्याची व्यवस्था करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील प्रत्येक तालुक्यात औद्योगिक प्रशिक्षण केंद्रात सर्व ट्रेड सुरु करणेबाबत

**(४७) ३४०९० (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील प्रत्येक तालुक्यात उपलब्ध असलेल्या औद्योगिक प्रशिक्षण केंद्रात सर्व ट्रेडच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तालुकांतर्गत औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतच प्रथमत: प्रवेश घेण्याचे बंधन प्रशिक्षणार्थीवर घालण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रवेश प्रथमत: तालुक्यातील प्रशिक्षणार्थ्यांसाठी राखून ठेवणारे व संधीला मर्यादा घालणारे शासनाने आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, गुणवत्तेनुरूप संधी देण्यास नकार देणारा सदरचा आदेश शासन मागे घेणार आहे काय,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. संभाजी पाटील-निलंगेकर (२८-०९-२०१७) :** (१) होय, हे खरे आहे.

राज्यातील प्रत्येक तालुक्यात असलेल्या सर्व औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शासनाकडून मंजूर व डिजीटी, नवी दिल्ली यांचेकडून सलग्नता प्राप्त व्यवसाय अभ्यासक्रमामध्ये प्रशिक्षणाची सोय उपलब्ध आहे.
(२) व (३) हे खरे नाही.

सर्वसामान्य प्रवेश पध्दतीमध्ये एकूण प्रवेशक्षमतेच्या उपलब्ध जागांपैकी मुळ तालुका पातळीवरील ७०% जागा हया महाराष्ट्र राज्यातील उमेदवाराने ज्या तालुक्यामधुन माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षा (SSC) दिलेली आहे त्याच तालुक्यामधील औ.प्र.संस्थेत प्रवेशासाठी उपलब्ध आहेत आणि एकूण प्रवेशक्षमतेच्या उपलब्ध जागांपैकी तालुकाबाहय पातळीवरील ३०% जागा हया महाराष्ट्र राज्यातील उमेदवाराने ज्या तालुक्यामधुन माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परिक्षा (SSC) दिलेली आहे त्या तालुक्याव्यतिरिक्त इतर तालुक्यातील औ.प्र.संस्थेमध्ये प्रवेशासाठी आरक्षित ठेवण्यात आल्या आहेत.

तसेच राज्यस्तरीय गुणवत्ता यादीमधील ज्या उमेदवाराने अशा तालुक्याबाहेरील ३०% जागांकरिता पर्याय दिला आहे त्यांना प्रवेश देण्यात येतो. ३०% जागांपैकी वरील प्रमाणे प्रवेश देवून रिक्त असलेल्या जागा, ७०% जागांकरिता पर्याय दिलेल्या उमेदवारांना पुढील फेरीत प्रवेशाकरिता उपलब्ध होतात.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुलुंड (पूर्व) मुंबई येथील म्हाडा कॉलनीत तसेच आसपासच्या परिसरात साथीच्या रोगांचा धोका निर्माण झाल्याबाबत

**(४८) ३४५९१ (११-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुलुंड (पूर्व) मुंबई येथील म्हाडा कॉलनीत तसेच आसपासच्या परिसरात डासांचा प्रादुर्भाव वाढला असल्याने साथीच्या रोगांचा धोका निर्माण झाला असल्याची बाब माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, डासांच्या उत्पत्तीवर त्वरीत नियंत्रण आणावे याकरिता म्हाडा कॉलनीत व सोसायटी असोसिएशनने बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या “टी” वार्डच्या सहाय्यक आयुक्तांना दिनांक १५ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त निवेदनाच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१७) :** (१) मुलुंड (पूर्व) येथील म्हाडा कॉलनी परिसरात डासांचा प्रादुर्भाव वाढला असल्याची बाब निदर्शनास आलेली नाही.

किटकजन्य आजारांपैकी मलेरिया, डेंग्यु, चिकुनगुनिया व जापनीस एनसेफलायटीस हे आजार डासांमार्फत होतात.

सदर ठिकाणी माहे जून २०१७ मध्ये वा त्यादरम्यान किटकजन्य आजारांच्या रुग्णांत वाढ झालेली नाही.

(२) याबाबतचे लेखी निवेदन महानगरपालिकेच्या “टी” वॉर्डच्या सहाय्यक आयुक्तांना प्राप्त झाले नसल्याचे महानगरपालिकेकडून प्राप्त माहितीत नमूद करण्यात आले आहे.

(३) व (४) सदर परिसरात केंद्र शासन व राज्य शासनाच्या मार्गदर्शक तत्वांनुसार या आजारांच्या प्रतिबंध व नियंत्रणासाठी महानगरपालिकेमार्फत पुढीलप्रमाणे उपाययोजना राबविण्यात येतात :-

- रुग्ण आढळून आल्यास त्याच्या घराच्या आसपास ५०० घरांमध्ये तापरुग्ण सर्वेक्षण व सहवासीतांचे सर्वेक्षण करण्यात येते.
- किटकनाशक विभागामार्फत धुम्रफवारणी करण्यात येते.
- घरांच्या बाहेर असलेल्या पाणी साठवण्याच्या ड्रममध्ये एबिटची प्रक्रिया केली जाते.
- विभाग स्तरावर परिसर स्वच्छता, डासोत्पत्ती स्थानके नष्ट करणे, निरुपयोगी, भंगार व कचऱ्याची विल्हेवाट लावणे, साचलेले पाणी वाहते करणे, खड्डे बुजविणे इत्यादी कामे प्राधान्याने करण्यात येतात.
- मलेरिया विभागातील कर्मचाऱ्यांद्वारे वस्तीपातळीवर घरोघरी जाऊन तापाच्या रुग्णांचे नमुने घेऊन त्यांना औषधोपचार करण्यात आले.
- मायकिंगद्वारे जनजागृती, गृहनिर्माण सोसायटयांमध्ये पोस्टर्स प्रदर्शन, शिक्षण संस्था, सामाजिक संस्था, बांधकाम विभागातील सुरक्षा अधिकारी व खाजगी वैद्यकीय व्यावसायिकांचे प्रशिक्षण घेण्यात आले.

---

## शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतर अधिक वास्तव्य केल्यास दंडनीय दरात वाढ केल्याबाबत

**(४९) ३४६४७ (१४-०९-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय निवासस्थानात अनुज्ञेय कालावधीनंतर अधिक वास्तव्य करण्याबद्दल दंडनिय दर रुपये १००/- प्रती चौरस फुट असा करणेत आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दंडनिय दरातील ही वाढ अतिशय जास्त असल्याबाबत सेवानिवृत्त कर्मचारी यांचेकडून सातत्याने तक्रार करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासकीय जमिनीवर अतिक्रमण करणाऱ्याला मोफत घर देण्याची नियोजनशुन्य योजना राबविणाऱ्या शासनाकडून आयुष्यभर शासनसेवा केलेल्या कर्मचाऱ्यांसाठी दंडनिय दरात मोठ्या प्रमाणात वाढ करणे अन्यायकारक आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर दंडनिय दर लागू करणारा सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. शानिवा-२५१५/प्र.क्र.३३/१७/२३-अ, दिनांक १५ एप्रिल, २०१७ तात्काळ मागे घेण्यात येईल काय,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०४-१०-२०१७)** : (१) होय.

(२) नाही. तथापि सेवानिवृत्त/ बदली झालेल्या कर्मचाऱ्यांकडून विविध कारणांसाठी बदली/ निवृत्तीनंतरही सवलतीच्या दराने भाडे आकारणी करुन निवासस्थान ताब्यात ठेवण्याबाबत विनंती करण्यात येते. परिणामी मुंबईतील कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांना निवासस्थान उपलब्ध होत नाहीत किंवा उपलब्ध होण्यास विलंब होतो.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही. तथापि शासकीय निवासस्थाने ही शासकीय सेवेत कार्यरत असेपर्यंतच्या कालावधीकरीता सेवा निवासस्थाने म्हणून शासन सेवेत कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांना वाटप केली जातात. त्यामुळे सेवानिवृत्ती/ बदलीनंतर शासकीय निवासस्थानात वास्तव्याचा अनुज्ञेय कालावधी संपुष्टात आल्यानंतर निवासस्थान रिक्त करणे आवश्यक असते. तथापि शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांमध्ये सेवानिवृत्ती/ बदली झाल्यावरही शासकीय निवासस्थाने अनधिकृतपणे ताब्यात ठेवण्याची प्रवृत्ती दिसून आल्याने बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात कार्यरत असलेल्या प्रतिक्षायादीतील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना निवासस्थान उपलब्ध व्हावे याकरीता दंडनीय दरात वाढ करण्यात आली आहे.

(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**मालाड (मुंबई) येथील मालवणी या ठिकाणी मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा यांनी दिलेल्या योजना कोड क्रमांक ५१ च्या भूखंडावर घरे बांधुन देण्याबाबत**

**(५०) ५१९३६ (२१-०८-२०१४). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप : दिनांक २२ मार्च, २०१३ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तराच्या यादी क्रमांक १९ मधील प्रश्न क्रमांक ३५०२७ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालाड (मुंबई) येथील मालवणी या ठिकाणी मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा यांनी योजना कोड क्रमांक ०५१अे-अेजीपी या प्रकारचा प्रवर्गाचा विकसित भूखंड दिनांक १९ जून, १९९७ रोजी २५ सभासदांसाठी देण्यात आला. मात्र या भूखंडावर अद्‌याप कोणतेही बांधकाम करण्यात आले नसल्यामुळे हे सभासद बेघर असल्याने त्यांच्यात तीव्र असंतोष पसरला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, योजना कोड ०५१ क्रमांकावर तातडीने बांधकाम करण्यात येऊन या बेघरवासियांना त्वरीत घरे देण्याबाबत शासनाने कोणती तातडीची कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) अद्‌याप, कोणतीच कार्यवाही करण्यात आली नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. देवेंद्र फडणवीस (०३-१०-२०१७) :** (१), (२) व (३) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ यांचेकडून प्राप्त अहवालानुसार जागतिक बँक प्रकल्प म्हाडा अंतर्गत सन १९९५ रोजी काढण्यात आलेल्या सोडत कोड क्र. ०५१, ०५२, ०५३ व ०५४ नुसार लाभार्थ्यांची संस्था तयार करुन देऊन त्यांच्या ताब्यात भूखंड देणे एवढेच मर्यादीत असून बांधकाम लाभार्थ्यांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थेने स्वखर्चाने करणे आवश्यक आहे.

मालाड मालवणी येथील योजना कोड क्र. ०५१, सन १९९३ ते २००३ पर्यंत पर्यावरण निर्बंधाने बाधित होते. सन २००३ मध्ये पर्यावरण व वन मंत्रालय (एम.ओ.ई.एफ.) नवी दिल्ली यांनी सदर योजनेसाठी पर्यावरण निर्बंध शिथिल केले. तद्नंतर मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट पिटीशन लॉजिंग क्र. ३२४६/२००५, दिनांक ०६/१०/२००५ रोजी दिलेल्या आदेशानुसार मॅनग्रोव्हज पासून ५० मीटर अंतरावर असलेल्या सर्व भूखंडाच्या विकसनास स्थगिती दिलेली आहे. दरम्यानच्या काळात सदरहू योजनेतील बऱ्याच लाभार्थ्यांच्या याद्यांची पुन्हा छाननी व पडताळणी करुन ताबा देण्यासाठी प्रकरण प्रलंबित आहे. सद्य:स्थितीत याद्यांचे काम अंतिम टप्प्यात असून मालवणी येथील सदरहू संस्थांबाबत लवकरात लवकर भूखंड ताब्यात देण्याची कार्यवाही करण्यात येईल असे मुख्य अधिकारी, मुंबई मंडळ यांनी त्यांच्या अहवालात नमूद केले आहे.

---

**विधान भवन :**
**नागपूर.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रकिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मुद्रणालय, नागपूर.